**महाराष्ट्र राज्य परिवहन महामंडळामध्ये बसस्थानक, यांत्रिकी कार्यशाळा, मध्यवर्ती कार्यशाळा येथे नविन सी.सी.टि.व्ही. यंत्रणा प्रस्थापित करण्याकरिता निधी वितरित करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**
**शासन निर्णय क्र.एसटीसी-०३२४/प्र.क्र.३१/परि-१**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक : २८ ऑगस्ट, २०२४.

**संदर्भ :-**

१) उपाध्यक्ष व व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य मार्ग परिवहन महामंडळ, मुंबई यांचे पत्र क्र.राप/मावतं/उपावव्यस/८६, दि.१५.०२.२०२४

२) उपाध्यक्ष व व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य मार्ग परिवहन महामंडळ, मुंबई यांचे पत्र क्र.राप/मावतं/उपावव्यसं/२३९, दि.२६.०६.२०२४.

**प्रस्तावना :-**

उपरोक्त संदर्भीय पत्रान्वये, उपाध्यक्ष व व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य मार्ग परिवहन महामंडळ यांनी केलेल्या विनंतीच्या अनुषंगाने, रा.प. महामंडळाच्या बसस्थानक, यांत्रिकी कार्यशाळा, मध्यवर्ती कार्यशाळा येथे सी.सी.टि.व्ही. यंत्रणा प्रस्थापित करण्यासाठी निधी उपलब्ध करुन देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

रा.प. महामंडळाच्या बसस्थानक, यांत्रिकी कार्यशाळा, मध्यवर्ती कार्यशाळा येथे नविन सी.सी.टि.व्ही. यंत्रणा प्रस्थापित करण्यासाठी, लेखाशीर्ष (३०५५ ००५२) ३५ याखाली रू.११२ कोटी ( अक्षरी रूपये एकशे बारा कोटी फक्त ) एवढा निधी खालील अटींच्या अधीन राहून रोखीने प्रदान करण्यास मान्यता देण्यात येत आहे :-

१) नविन सी.सी.टि.व्ही. प्रकल्पासाठी उपलब्ध करुन देण्यात येत असलेल्या रु.११२ कोटी इतका निधी रा.प.महामंडळाची आर्थिक स्थिती सुधारुन महामंडळ तोट्यातून फायद्यात आल्यानंतर महाराष्ट्र राज्य मार्ग परिवहन महामंडळाकडून त्याची प्रतिपूर्ती शासनास करण्यात यावी.

२) सदर प्रकल्पाच्या प्रस्तावास नियमानुसार प्रथम प्रशासकीय मान्यता घेण्यात यावी.

३) प्रशासकीय मान्यता प्राप्त झाल्यानंतरच सदर प्रकल्पाची स्पर्धात्मक ई-निविदा प्रसिध्द करण्याची कार्यवाही करून पुढील नियमोचित कार्यवाही करण्यात यावी.

२. सदर रु.११२ कोटी हा खर्च सन २०२४-२५ या आर्थिक वर्षामध्ये "मागणी क्रमांक बी-३, ३०५५ मार्ग परिवहन ००-१९० सार्वजनिक क्षेत्रातील व इतर उपकामांना सहाय्य (००) (००) (०१) महाराष्ट्र राज्य मार्ग परिवहन महामंडळ बसस्थानकांचे आधुनिकीकरणांतर्गत बांधकाम व इतर सोयी सुविधा (३०५५ ००५२) ३५ भांडवली मत्तेच्या निर्मीतीकरीता अनुदान" या लेखाशिर्षाखाली उपलब्ध असलेल्या तरतूदीमधून खर्ची टाकण्यात यावा. सदरचे अर्थसहाय्य हे "सशर्त" आहे.

३. यासाठी परिवहन आयुक्त, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांना प्राधिकृत करण्यात येत असून त्यांच्या कार्यालयातील आंहरण व संवितरण अधिकारी असलेले लेखाधिकारी यांनी सदर रक्कम आंहरित करुन महाराष्ट्र राज्य मार्ग परिवहन महामंडळास अदा करावी.

४. हा शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्र.४४७/२०२४/व्यय-८, दि.०७.०८.२०२४ अन्वये प्राप्त झालेल्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०२४०८२८१५०७४९१४२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

SARIKA ASHISH GANVIR

Digitally signed by SARIKA ASHISH GANVIR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=HOME DEPARTMENT, 2.5.4.20=355d31d0cf7bf8d02352945a11a765b0f536fe1adfd0fff4aad6f9dd87f3d76b, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=D50DB68513E91376BA0547B675FDF1B1F3E1AB721046013C8F2C377536F96AC5, cn=SARIKA ASHISH GANVIR
Date: 2024.08.28 15:25:48 +05'30'

**( सारिका गणवीर )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) मा. राज्यपालांचे सचिव, राजभवन , मुंबई.
२) मा. मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई.
३) मा. उपमुख्यमंत्री (गृह) यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई
४) मा. उपमुख्यमंत्री (वित्त व नियोजन) यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई
५) मा. सभापती, महाराष्ट्र विधान परिषद यांचे खाजगी सचिव, विधान भवन, मुंबई
६) मा.अध्यक्ष , महाराष्ट्र विधान सभा यांचे खाजगी सचिव, विधान भवन, मुंबई
७) मा. विरोधी पक्ष नेता, महाराष्ट्र विधान परिषद यांचे खाजगी सचिव, विधान भवन, मुंबई
८) मा. विरोधी पक्ष नेता, महाराष्ट्र विधान सभा यांचे खाजगी सचिव, विधान भवन, मुंबई
९) मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई.
१०) अपर मुख्य सचिव (परिवहन), मंत्रालय, मुंबई.
११) परिवहन आयुक्त, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
१२) उपाध्यक्ष व व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य मार्ग परिवहन महामंडळ, मुंबई.
१३) वित्तिय सल्लागार व मुख्य लेखा अधिकारी, महाराष्ट्र राज्य मार्ग परिवहन महामंडळ, मुंबई.
१४) महालेखापाल १/२ (लेखा व अनुज्ञेयता /लेखा परिक्षा), महाराष्ट्र, मुंबई / नागपूर.
१५) महालेखापाल (वाणिज्यिक लेखा परिक्षा), मुंबई.
१६) कक्ष अधिकारी (अर्थ-१), गृह विभाग, मंत्रालय, मुंबई.
**१७)** निवडनस्ती कार्यासन परि-१, गृह विभाग, मंत्रालय,मुंबई.